नियतकालिक बदल्या - २०२०

विभागीय वन अधिकारी गट-अ (वरिष्ठ श्रेणी)

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग, मंत्रालय,**

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०२०/प्र.क्र.७४/फ-८.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १० ऑगस्ट, २०२०

**संदर्भ :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक),नागपूर यांचे पत्र क्र कक्ष-९/मवसे/मुले/ /बदली-विवअ/प्र.क्र.२६/१९-२०/४०५/२०-२१, दि.०९/०७/२०२०.

**शासन आदेश :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कामे पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (२) व ४ (४) अंतर्गत तरतुदीनुसार विभागीय वन अधिकारी,गट-अ (वरिष्ठ श्रेणी) या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या नियतकालिक तथा प्रशासकीय बदल्या खालीलप्रमाणे करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व कार्यरत पद | बदलीने पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|
| १ | कु. निता भाऊसाहेब कट्टे (ढेरे) अपर निदेशक (प्रशिक्षण), फॉरेस्ट अकॅडमी ॲडमिनिस्ट्रेशन डेव्हलपमेंट ॲन्ड मॅनेजमेंट, कुंडल | विभागीय वन अधिकारी (योजना) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) नागपूर यांचे कार्यालय. | रिक्त पदावर |
| २ | श्री. राम शंकर धोत्रे विभागीय वन अधिकारी (योजना) चंद्रपूर. | विभागीय वन अधिकारी (योजना) गडचिरोली . | रिक्त पदावर |
| ३ | श्री. दिपक पोपटराव खाडे, विभागीय वन अधिकारी (सामाजिक वनीकरण) कोल्हापूर. | विभागीय वन अधिकारी चिपळुण,रत्नागिरी . | श्री. रमाकांत भवर यांच्या सेवानिवृत्तीमुळे ऑगस्ट, २०२० अखेर रिक्त हेणाऱ्या पदावर |
| ४ | श्री. विजय राजाराम खेडकर विभागीय वन अधिकारी (वन्यजीव), कोल्हापूर. | विभागीय वन अधिकारी (कॅम्पा व भुमीमापन) पुणे . | रिक्त पदावर |
| ५ | श्री. पी.बी. पंचभाई, विभागीय वन अधिकारी (प्रशिक्षणावर) | विभागीय व्यवस्थापक गोरेवाडा प्रकल्प, नागपूर | रिक्त पदावर |
| ६ | श्री. विशाल माळी, विभागीय वन अधिकारी, (संशोधन व वन्यजीव), अमरावती | विभागीय वन अधिकारी (वन्यजीव) कोल्हापूर | श्री. खेडकर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या जागेवर |

२.	उपरोक्त अधिकाऱ्याच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३.	सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, संबंधित अधिकाऱ्याला नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले, याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

४.	संबंधित अधिकाऱ्याला शासनाच्या पूर्वपरवानगी शिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधित अधिकाऱ्याला मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५.	सदरहू बदली आदेशानुसार संबधित अधिकारी तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारे असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६.	सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२००८१०१४३८३३७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil Niwrutti Dhas

Digitally signed by Anil Niwrutti Dhas
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, serialNumber=f85f1c64c05886c8d514e40d54d27ff3a80ffd907a05433b1c412b7f7ffa0afd, cn=Anil Niwrutti Dhas
Date: 2020.08.10 14:50:31 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१)	प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.

२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र वन विकास महामंडळ मर्या. नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण ) महाराष्ट्र राज्य,पुणे.
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) नागपूर.
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
७) महासंचालक, कुंडल विकास प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल.
८) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक),अमरावती/पुणे/नागपूर/ गडचिरोली/कोल्हापूर/ चंद्रपूर
९) मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना) नागपूर.
१०) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सहयाद्री व्याघ्र राखीव, कोल्हापूर.
११) वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, पुणे.
१२) उप वनसंरक्षक (प्रा.) नागपूर.
१३) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय सांगली/ नागपूर/चंद्रपूर/ गडचिरोली / अमरावती/कोल्हापूर/ रत्नागिरी/पुणे.
१५) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१६) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१७) अपर मुख्य सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१८) संबंधित अधिकारी ( प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), म.रा.नागपूर यांचे मार्फत)
१९) वन विभागातील सर्व कार्यासने
२०) निवड नस्ती (फ-८ कार्यासन).